शोभा भागवत

## मुलं खेळतात - जग मोठं करतात !

कुणी विचारलं की मुलाचं पहिलं खेळणं काय असतं ? तर आपण म्हणू चिमणाळं, खुळखुळा. पण ह्या खेळण्यांच्या आधीचंही एक खेळणं असतं. ते असतं आईच्या पोटात. मूल आईच्या पोटात असताना स्वत:च्या नाळेशी खेळत असतं. ते नाळ पकडतं, सोडतं असा त्याचा खेळ चालतो. तान्ही मुलं सुध्दा स्वत:चं जावळ पकडतात, स्वत:चे कान ओढतात, स्वत:च्या हातापायांशी देखील "हे काय आहे ? हे असं काय हलतं आहे ?" असं कुतुहल डोळ्यात घेऊन ती खेळत असतात. लहान मुलाला सगळं जगच नवीन असतं. सगळ्याविषयी त्याला कुतुहल असतं. त्यामुळे मूल कशाचाही खेळ करु शकतं. आणि तरीही आनंदासाठी केलेली ही कृती मुलाच्या दृष्टीनं अतिशय गंभीर कृती असते. Play is a serious activity for children.

मानसिक शांतीसाठी, ध्यानासाठी जे सांगितलं जातं ते कौशल्य मुलात जन्मत:च असतं. ते म्हणजे 'क्षणस्थ' असण्याचं. ज्या क्षणी जे आपण करत असतो त्यात पूर्णपणे स्वत:ला विसरुन जाण्याचं कौशल्य, वृत्ती. माँटेसरी बाईंना ह्या अनुभवानी चकित केलं होतं - एक छोटी मुलगी आकारांच्या पेटीत त्या त्या आकाराचे ठोकळे टाकत होती त्यात ती इतकी दंग झाली होती की तिला त्या पेटीसकट उचलून टेबलावर ठेवलं तरी तिचं लक्ष विचलित झालं नाही. इतक्या तन्मयतेनं मूल खेळत असतं. खेळताना त्याचं इतर कशाकडेही लक्ष नसतं म्हणूनच त्याला खेळातून आनंद मिळतो, खेळातून मूल शिकतं, खेळातून ते माहिती, ज्ञान मिळवतं, त्याच्यावर संस्कार होतात. मात्र ह्या सगळ्या गोष्टी त्या आनंदामुळे निर्माण होणाऱ्या गोष्टी असतात. खेळातला आनंद काढून टाकला आणि शिकण्यासाठी, संस्कारासाठी असे शिक्के मारुन खेळ निर्माण केले तर हाती काहीच लागणार नाही.

रंगीबेरंगी, विविध आवाज करणारी खेळणी तान्ह्या बाळाला आवडतात. खेळणी इकडून तिकडे हलवली की बाळ त्या दिशेनं पाहतं, मान वळवतं. खेळता खेळताच बाळाची शब्द, स्पर्श, रुप, रस, गंधाची कौशल्यं वाढत जातात. त्यामुळे पहिल्या दोन तीन महिन्यांपासूनच त्याला वेगवेगळ्या रंगांची, आवाजांची खेळणी पहायला मिळाली पाहिजेत. त्याबद्दल भोवतालची मोठी माणसं जे बोलतील, गप्पा मारतील त्यातून मुलाच्या कानावर भाषा पडत राहील.

वेगवेगळी बाळगाणी हेही बाळाला भाषा शिकवण्याचं महत्त्वाचं साधन आहे. लहान मुलांच्या पालकांना अशी गाणी करायला शिकवायला हवं. बाळाला अंघोळ घालताना, झोपवताना, जेवू घालताना, त्याला खेळवतांना म्हणायची गाणी सर्वांना यायला हवीत. त्यानिमित्तानं त्याच्या कानावर भरपूर प्रमाणात भाषा पडणं महत्त्वाचं.

नवलाची गोष्ट अशी की पुस्तकांशी लहान बाळाचं नातं तिसऱ्या महिन्यापासून जोडता येतं. रंगीत पुस्तक त्याच्यासमोर धरुन हे कबूतर आहे, ही चिमणी आहे, हा बघा पोपट, अरे वा, हा तर विदूषक अशी चित्रं दाखवत गेलं की बाळ चित्रं बघायला शिकतं. ते पुस्तक त्याला खेळणंच वाटत असतं. खेळणं म्हणून

......२

पुस्तक मुलाच्या परिचयात येणं फार महत्त्वाचं आहे. अभ्यास म्हणून पुस्तकाचा परिचय नंतर व्हायला हवा. आता वेगवेगळे आवाज करणारी पुस्तकं मिळतात, ज्या पुस्तकात मुलांना फोनची बटणं दाबता येतात अशी पुस्तकं मिळतात, काजव्यांसारखे दिवे लुकलुकतात अशीही पुस्तकं असतात. अशा पुस्तकांशी मूल खेळू लागलं की त्याची आणि पुस्तकांची कायमची दोस्ती होते. मूल पुस्तकातली चित्रं वाचू लागतं. या पानावर मनीमाऊ कुठे आहे ? या चित्रात झेंडा कुठे आहे ? असे खेळ पुढे वर्ष दीड वर्षाच्या आसपास खेळता येतात. पुस्तकांमुळे मुलाचं विश्व खूपच मोठं होतं. हल्ली विविध स्पर्श ज्यातून शिकता येतात अशी पुस्तकं मिळतात. क्वचित विविध गंध ज्यातून येतात अशीही पुस्तकं मिळतात. छोट्या छोट्या गोष्टी सुंदर चित्रांमधून सांगणारी संस्कारक्षम पुस्तकं मिळतात.

इथे महत्त्वाची गोष्ट लक्षात घ्यायला हवी की इतर कुठल्याही साधनांपेक्षा आई, वडील, आजी, आजोबा, शिक्षक ही मुलाच्या शिक्षणाची सर्वात मोठी साधनं, सर्वात मोठी खेळणी असतात. ती जेवढी कल्पक असतील, सृजनशील असतील तेवढं मूल अनेक गोष्टी भराभर शिकत जाईल. भावंडं, मित्रमंडळी हीपण महत्त्वाची भूमिका करत असतात.

मूल सतत कशाशीही खेळत असतं, शिकत असतं हे लक्षात घेऊन घरातल्या बऱ्याच गोष्टींचा शिकण्यासाठी उपयोग करुन घेता येतो. उन्हाळ्यात मूल बराच वेळ पाण्यात खेळू शकतं. वेगवेगळ्या छोट्या बाटल्यांमधे पाणी भरणं, नरसाळ्यातून बाटलीत पाणी भरणं, गाळण्यासारख्या खेळण्यातून पाण्याच्या धारा करणं, पाण्याचे फवारे उडवणं, कितीतरी प्रकार मुलं शोधून काढतात आणि रंगून जाऊन खेळत राहतात.

घरातला आणखी एक मुलांना अतिशय आवडणारा खेळ म्हणजे तंबू तंबू करायचा खेळ. मोठी चादर डोक्यावर घेऊन आत बसायचं मग मुलांबरोबर कोणीही बसावं आई-बाबा-आजी-आजोबा मोठं भावंडं. फार गंमत येते त्यांना. मग तंबूत एखादं खेळणं लपवायचं ते शोधायचं आपण नाटक करायचं आणि 'अरे ! सापडलं' म्हटलं की अतिशय आनंद होतो. मग मुलं लगेच तत्परतेने ते पुन्हा लपवतात.

एखादी छोटी उशी घेऊन तिची फेकाफेकी हा असाच दंग्याचा खेळ असतो. आपण ती मुलाकडे फेकायची आणि त्यानं आपल्याकडे हा खेळ कितीही वेळ रंगू शकतो.

घरात काहीही काम चालू असलं की लहान मुलांना त्यात रस असतोच. आई कुकर लावणार असते तेव्हा काढलेल्या तांदुळात त्यांना हात घालून पहायचं असतं. डाळ हातात घेऊन पहायची असते. भाजीच्या फोडींशी खेळायचं असतं. भाजी चिरल्यानंतर टाकून द्यायची देठं, काड्या, साली अशा गोष्टीसुध्दा मुलांची खेळणी असतात. या सगळ्यांशी त्यांना खेळू द्यायला हवंच. एकतर अनेक स्पर्शांची त्यांना सवय होते. बोटं तयार होतात. कोणतीही वस्तू हाताळण्याचं कौशल्य हातात येतं. मग त्यामुळे वस्तू हातातून पडल्या, फुटल्या असं फारसं घडत नाही. बोटांच्या हालचालींचा आणि मेंदूच्या वाढीचाही जवळचा संबंध आहे त्यामुळे अगदी धोकादायक वस्तू वगळता सर्व गोष्टी मुलांना हाताळू द्याव्यात. अडीच तीन वर्षाची मुलं कात्री, सुरी या गोष्टीही जपून वापरु शकतात. एका लहान बाळाचा अनुभव या बाबतीत आपल्याला खूप शिकवणारा आहे. रांगत्या बाळासमोर टाचण्यांचा ढीग ठेवला. प्रथम त्यानं त्या मुठीत घ्यायचा प्रयत्न केला. हाताला

टोचलं. त्याबरोबर त्यानं एकेक टाचणी चिमटीत पकडून बाजूला केली. इतका मुलांचा शिकण्याचा वेग असतो.

माती, पाणी, वाळू, लाकडाचे विविध आकाराचे ठोकळे, पानं, काड्या अशा नैसर्गिक गोष्टींशी खेळण्यातून मुलांच्या मनावरचे ताण दूर होतात. त्यामुळे बालवाड्यांमधे एखादा वाळूचा हौद, पाण्याचा उथळ हौद, लाकडाचे गोल, चौकोन, त्रिकोण, दंडगोल, कमान, अर्धवर्तुळ असे अनेक आकारांचे ठोकळे हवेतच. या खेळण्यांची गंमत अशी असते की हे खेळताना बरोबर, चूक असं काही कुणी सांगावं लागत नाही. म्हणजे ते सांगू नयेच. त्यामुळे मुलांना स्वातंत्र्य मिळतं आणि त्यामुळे त्यांना हवे ते प्रयोग त्यात ती करतात. मग ती वाळूचे डोंगर करतात, किल्ले करतात, वाळूत विहीर, तळं करतात, त्यात पाणी भरतात, ओल्या वाळूच्या मुदी पाडतात, आकार करतात, वाळूत झाडं रोवतात, बोगदे करतात. त्यांना हवं तसं खेळू दिलं तरच त्यांच्यातल्या सृजनाला व्यक्त व्हायला संधी मिळते. आपल्या मनातही येणार नाही असे विविध आविष्कार आपल्याला पहायला मिळतात. एकदा एका मुलानं त्यानं केलेला वाळूतला किल्ला मला दाखवला आणि म्हणाला, ''ताई, हा शिवाजी महाराजांचा किल्ला आहे बरं का आणि हा इकडे जाणारा वन वे आहे.'' शिवाजीमहाराजांनीही कधी वन वे केले नसतील कदाचित !

मुलं फार भरभर वाढत असतात हे मात्र आपण नेहमी लक्षात ठेवलं पाहिजे. एक बाबा एकदा तक्रार घेऊन आले होते. ते सांगत होते, ''मी रोज आरामखुर्चीत बसून पेपर वाचतो. माझा मुलगा एकदा माझी नक्कल करत होता. म्हणून मी त्याला छोटी आरामखुर्ची आणली. तो एकदोन दिवस त्यात बसला पेपर उलटा धरुन वाचला. पण तेवढंच ! आता तो त्यात बसतच नाही.'' मी मनात म्हटलंख ''दोन दिवसात मुलगा वाढला पण बाबा तेवढेच राहिले ना !'' मुलानं खुर्चीत बसून पाहिलं, संपलं ! त्याचा रस संपला. बाबांना मात्र वाटत होतं त्यानं रोज तसं करावं नाहीतर खुर्ची वाया जाईल ! अशा वेळी काही दिवस खुर्ची त्याच्या नजरेआड ठेवली आणि परत काही दिवसांनी काढली तर त्याला आनंद वाटेल पुन्हा तो कदाचित तिच्यात बसेल. तुम्ही खेळण्यांसाठी किती पैसे खर्च करता, ती परदेशातून आणता की गावातून याच्याशी मुलांना काही कर्तव्य नसतं. त्यांना नाविन्य हवं असतं. त्यांना कित्येक खेळणी उघडून मोडून पहायची असतात. कितीवेळा आणली तरी फुगे, भिरभिरी अशी खेळणी पुन्हापुन्हा हवीच असतात. त्यामुळे मुलांना मनापासून आवडतात अशी खेळणी त्यांच्या हाती देत राहणं, त्यात बदल करणं हे पालकांचं कौशल्य आहे. ज्या खेळण्यात त्यांच्या किमतीमुळे पालकांचा जीव गुंतला आहे. ती खेळणी नाही आणली तरी चालेल. कारण मग पालकांनी ती खेळणी कपाटात लपवून ठेवणं, शोकेसमध्ये बंद करुन ठेवणं मुलांना हात लावू न देणं हे मुलांना अपमानकारक वाटतं.

एका मुलीला आईनी हौसेनं चांदीची भातुकली केली. आणि ती आई काढून देत नसे. एकदा आई झोपलेली असताना मुलीनं ती काढली तर उठल्यावर आई तिला खूप ओरडली. त्यावर मुलगी म्हणाली, ''ज्या खेळण्यांशी खेळायला मला तुझी परवानगी घ्यावी लागेल, ती खेळणी तू मला आणत जाऊ नकोस.'' म्हणूनच भारी खेळणी घरात बंद असतात आणि मुलं आनंदानं रस्त्यावर टायरशी खेळत असतात.

......४

एका कल्पक गृहस्थांनी शाळा बांधतांना शाळेच्या भिंतीतच वेगवेगळे आकार करुन घेतले. त्यामुळे मुलं येता जाता त्यावर बोटं फिरवून गोल, चौकोन, त्रिकोण शिकली. अक्षरं शिकली. त्यांनी खिडक्यांमधेच मणी ओवले. ते फिरवत फिरवत मुलं आकडे मोजायला शिकली. एका मैदानावर सगळे खेळ गाड्यांच्या जुन्या टायरमधून केलेत. टायरचे झोपाळे, टायरच्या घसरगुंड्या, टायरचे पूल, टायरचे मनोरे, टायरमधून उड्या मारायची खेळणी. हे प्रत्येक शाळेत करता येईल.

आम्ही एकदा असं ठरवलं की मुलांना बोगदा आवडतो तर बालभवनात एक बोगदा बांधून घेऊ. बोगदा करण्यासाठी कामगारांनी माती खणून बाजूला तिचा ढीग लावला. तर मुलं म्हणाली, "ताई, हा मातीचा ढीग असाच ठेवा बरं का आम्हाला पाहिजे खेळायला." मग ती म्हणाली "बोगदा केल्यावर त्याच्यावर चढायला आम्हाला पायऱ्या पाहिजेत." बोगदा करताना एका बाजूला उतार झाला होता तर मुलांची सूचना आली, "या उताराची घसरगुंडी करुन द्या म्हणजे आम्ही घसरुनच बोगद्यात जाऊ" आणि सगळं तयार झाल्यावर मुलं म्हणाली, "आता आतून बाहेर बघायला छोट्या खिडक्या करुन द्या की." शेवटी असं ते मुलांनी रचना केलेलं सुंदर खेळणं तयार झालं. आता त्या मातीच्या ढिगावर विटा लावल्यात त्यावर मुलं खेळतात. त्यावरुन, पायऱ्यांवरुन बोगद्यावर चढतात, बोगद्यातून बाहेर छोट्या खिडक्यांमधून पाहतात आणि घसरगुंडी तर त्यांची आवडतीच ! मुलांचा सल्ला घेतला तर अशी अनेक सुंदर खेळणी तयार होतील.

एकदा बालवाडीच्या बाईंनी मला त्यांचं फार सुंदर निरीक्षण सांगितलं होतं. त्या म्हणाल्या, "आमच्याकडे अनेक नवीन खेळणी आहेत पण मुलं जेव्हा मोडक्या खेळण्यांचा टब त्यांच्यासमोर येतो, तेव्हा त्या मोडक्या खेळण्यांशी सर्वात जास्त रंगून जाऊन खेळतात. कारण अनेक खेळणी मोडल्यामुळे त्यांच्या आत काय आहे ते दिसत असतं. ते मुलांना बघायचं असतं." हे निरीक्षण फार बोलकं आहे.

खेळण्यांच्या बाबतीत अरविंद गुप्ता हे शास्त्रज्ञ जो विचार करतात तो फार महत्त्वाचा आहे. त्यांचं म्हणणं भारतातल्या कुठल्याही लहान गावात आजूबाजूला पडलेल्या वस्तूंमधून मुलांना सहज बनवता येतील अशी खेळणी हवीत. त्यामुळे त्यांच्या खेळण्यांमधे काडेपेट्या, काडेपेटीतल्या काड्या, जुन्या स्लीपरचे तुकडे, कुंच्याच्या काड्या, स्ट्रॉ, पुठ्ठे, तारा, बॉलपेनचे जुने रिफिल्स अशा अनेक वाया गेलेल्या वस्तूंचा उपयोग केलेला असतो. सहाशे रुपयांचं खेळणं त्यातलं मूळ वैज्ञानिक तत्त्व लक्षात घेऊन दोन रुपयात कसं करता येईल ते गुप्ताजी शोधून काढतात.

घरातल्याच अनेक वस्तूंमधून आम्ही बालभवनात गंमतजत्रा मांडतो. ही गंमतजत्रा कुठल्याही लहान गावातल्या लहान शाळेतही मांडता येते. त्यात एक भाग असतो "ओळखा पाहू." या भागात कधी आम्ही पालेभाज्यांचे प्रकार मांडतो ते मुलं ओळखतात. अशीच कडधान्यं, डाळी, मसाल्याचे पदार्थही मांडले जातात. नेत्यांची चित्रं ओळखायला सांगता येतात. हॅटच्या साम्यामुळे एकदा ही चित्रं ओळखताना एक मुलगी भगतसिंगला चार्ली चॅप्लिन म्हणाली होती. देशांच्या राजधान्या ओळखता येतात, फुलं, पानं ओळखता येतात. मग नेमबाजीचे खेळ त्यात ठेवता येतात. एकावर एक मांडलेले प्लास्टिकचे ग्लास चेंडूनी पाडणं,

टांगलेल्या टायरमधून बॉल टाकणं, राक्षसाच्या तोंडात बॉल टाकणं, डोळे बांधून गाढवाच्या चित्राला शेपूट काढणं असे अनेक खेळ. पायानी लगोरी लावणं, मागे हात बांधून बशीतले चुरमुरे, पिठातली गोळी खाणं. दहा पंधरा बाटल्या आणि त्यांची झाकणं ठेवलेली असताना नेमकं झाकण उचलून त्याच्या योग्य बाटलीला लावणं, दहा पंधरा कुलपं ठेवलेली असतात. त्यांच्या किल्ल्या शोधणं, गव्हाच्या पातेल्यातून छोटं नाणं शोधून काढणं करता येतात.

निसर्ग हे तर खेळण्याचं आणि शिकण्याचं कितीतरी मोठं अंगण आहे. छोट्या मुलांच्या गटात आम्ही एक खेळ खेळतो. त्यांना सांगायचं पारिजातकाला हात लावून या, अशोकाचं पान आणून द्या, लाल पान कुठे आलंय् बघून या, बुलबुलानी कुठे घरटं केलंय् सांगा, गुलमोहराची एक ठिपक्यांची पाकळी घेऊन या, गोकर्णाचा वेल कुठे लावलाय् शोधून या, आवळ्याच्या झाडावर आवळे आहेत का बघा, कढीलिंबाच्या पानाचा वास घेऊन या. या खेळातून त्या त्या झाडांची, फुलांची, फळांची ओळख पक्की होते. या झाडांना मुलं पाणी घालतात, खत घालतात त्यामुळे तो परिचय फक्त बौध्दिक पातळीवरचा रहात नाही तर जिव्हाळ्याचं नातं या झाडांशी राहतं आणि निसर्गाच्या प्रेमाचा, पुढे संरक्षणाचा बहुमूल्य संस्कारही होतो.

छोट्या मुलांच्या अनेक सहली आम्ही वर्षभरात नेतो. त्यात वेगवेगळ्या बागांमधे जाणं हा मुख्य कार्यक्रम असतो. तेव्हाही अशीच झाडांशी त्यांची मैत्री होते. एखाद्या बागेत कैलासपतीचा परिचय होतो, एखाद्या बागेत शंकरजटेचं दर्शन होतं, कधी दुर्मिळ बेलाचं झाड दिसतं तर कधी जकरंदाचं सुंदर रुप पहायला मिळतं. मुलं अक्षरश: खेळत खेळतच हे सगळं शिकत असतात.

सण-उत्सव हेही मुलांना खेळायला आणि शिकायला अनेक निमित्तं पुरवतात. गणपतीत आमची मुलं प्रत्येकाचा स्वतंत्र गणपती तयार करतात. दहीहंडीला हंडी रंगवतात. दिवाळीत किल्ले करतात, आकाशकंदिल करतात, रांगोळ्या काढतात, ग्रीटिंग्ज तयार करतात, पणत्या रंगवतात. संक्रांतीला मातीची सुगडी रंगवतात, होळीला नैसर्गिक रंग तयार करतात, मुखवटे करतात, नागपंचमीला नाग तयार करतात. आपण त्याला हस्तकला म्हणू पण मुलांसाठी तो खेळच असतो आणि तो ते अतिशय गंभीरपणे खेळतात.

छोट्या मुलांचे अनेक मैदानी आणि बैठे खेळ हे तर त्यांची तत्परता, चटपटीतपणा, स्मरण, आकलन, सहकार्य, मित्रांचं कौतुक, मित्रांना आपलं काही देणं, घेणं अशा अनेक गुणांना आवाहन करणारे असतात. मात्र नवे नवे खेळ कायम शोधत रहावं लागतं.

मूल कायम आनंदाच्या शोधात असतं. ते खेळतच असतं. आपली मोठ्या माणसांची जबाबदारी अशी असते की त्यांना अनेक प्रकारे खेळायला अवकाश मिळवून देणं. त्यांच्या खेळात सहभागी होणं आणि हसत खेळतच त्यांना अभ्यासाच्या, व्यासंगाच्या, मूल्यांच्या, कौशल्यांच्या, जगावरच्या प्रेमाच्या वाटेवर हळुवारपणे नेऊन सोडणं.

❑❑❑